**सन २०१८,खरीप हंगामात शासनाने दुष्काळ जाहीर केलेल्या भागात जनावरांच्या चारा छावणीची विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना देयक अदा करण्याकरीता लेखाशीर्ष (२२४५ ००७५) व (२२४५ २१४९) अंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन (आप.व्य.म.व पु.)विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-एससीवाय-२०२१/प्र.क.३२/म-११,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- ३१.३.२०२२

**वाचा:-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७, दिनांक २५/०१/२०१९ व दिनांक १३/०२/२०१९.
२) महसूल व वन विभाग, शासन पत्र, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७,दिनांक ०८/०३/२०१९.
३) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.१२६/म-७, दिनांक २२/०३/२०१९.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७,दिनांक०४/०५/२०१९ व दिनांक१६/०५/२०१९.
५) विभागीय आयुक्त, औरंगाबाद जाक.क्र.२०२१/मशाका/नै.आ./कावि-,दि.२९/०३/२०२१ व दि.०६/०५/२०२१.
६) महसूल व वन विभाग,पुनर्वि-२०२१/२२४५/प्र.क्र.४९/ब-१,दिनांक १६/०६/२०२१.
७) महसूल व वन विभाग, शासन पत्र क्र.सीएलएस -२०२१/प्र.क्र.१२१/म-३, दि.१७.९.२०२१

**प्रस्तावना :-**

सन २०१८ च्या खरीप हंगामात राज्यातील जिल्हयांमध्ये सरासरीपेक्षा कमी पर्जन्यमान झालेले असल्याने, शासनाने राज्यातील २६ जिल्हयांमध्ये १५१ तालुक्यात, या १५१ तालुक्यांव्यतिरिक्त २६८ महसुली मंडळामध्ये दुष्काळ तसेच, या क्षेत्राव्यतिरिक्त राज्यातील ९३१ गावांमध्ये दुष्काळसदृश्य परिस्थिती घोषित केलेली आहे. दुष्काळग्रस्त भागातील जनावरांना आवश्यक असलेल्या चाऱ्याच्या प्रश्नावर मात करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांसदर्भात दिनांक २४/०१/२०१९ रोजी पार पडलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या बैठकीत, राज्यातील दुष्काळी भागात आवश्यकतेनुसार जनावरांना चारा व पाणी उपलब्ध करून देण्यासाठी जनावरांच्या छावण्या उघडण्याचा निर्णय घेण्यात आला. या अनुषंगाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये चारा छावण्या उघडण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.०५ येथील दि.२९.३.२०२१ च्या पत्रान्वये विभागीय आयुक्त,औरंगाबाद यांनी खरीप-२०१८ हंगामात शासनाने दुष्काळ जाहिर केलेल्या भागात जनावरांच्या चारा छावण्याकरीता औरंगाबाद जिल्हयाकरीता अपुरा पडलेला अतिरिक्त निधी व जिल्हाधिकारी, बीड यांनी ऑगस्ट २०२० अखेरपर्यंत लेखापरीक्षणाच्या अधिन राहून वितरीत करण्याकरीता राखीव ठेवलेल्या अनुदानाच्या वितरणाकरीता मिळून लेखाशीर्ष (२२४५ ००७५) अंतर्गत

रुपये १३,०६,४४,६६८/- व (२२४५ २१४९) अंतर्गत रुपये ४,६८,१९,४१०/- अशी एकूण (०.२५% प्रशासकीय खर्चासह) रुपये १७,७४,६४,०७८/- इतक्या निधीची मागणी केली आहे. याबाबतचा प्रस्ताव राज्य कार्यकारी समितीसमोर ठेवण्यात येऊन त्यास समितीने दि.२३.८.२०२१ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना खरीप-२०१८ हंगामात शासनाने दुष्काळ जाहीर केलेल्या भागातील जनावरांच्या चारा छावण्यांच्या औरंगाबाद जिल्हयाकरीता अपुरा पडलेला अतिरिक्त निधी व जिल्हाधिकारी, बीड यांना ऑगस्ट,२०२२० अखेरपर्यंत लेखापरीक्षणाच्या अधिन राहून वितरीत करण्याकरीता राखीव ठेवलेल्या अनुदानाच्या वितरणाकरीता खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे निधी वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हा | महिना | लेखाशीर्षांतर्गत आवश्यक असलेला निधी (०.२५% प्रशासकीय खर्चासह) | | एकूण वितरीत करावयाचा निधी (रक्कम रुपयात) |
|---|---|---|---|---|---|
| | | | (२२४५ ००७५) | (२२४५ २१४९) | |
| १. | औरंगाबाद | मे व जुन, २०१९ | ६,३३,७८६ | १,४८,९१६ | ७,८२,७०२ |
| २. | बीड | ऑगस्ट,२०२० अखेर | १३,००,१०,८८२ | ४,६६,७०,४९४ | १७,६६,८१,३७६ |
| | | एकूण | १३,०६,४४,६६८ | ४,६८,१९,४१० | १७,७४,६४,०७८ |

२. सन २०२१-२२ या चालू वित्तीय वर्षामध्ये मागणी क्र.सी-६,२२४५, नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य,०१, अवर्षण,१०१,अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकांनुसार खर्च (९१)(०३) जनावरांच्या छावण्यांमध्ये चारा, पाणी, औषधे यांचा पुरवठा आणि छावण्यापर्यंत चाऱ्याच्या वाहतुकीचा खर्च (अनिवार्य),३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ ००७५) व मागणी क्र.सी-६,२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, (९२) (०७) वैरण पुरवठा (अनिवार्य) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ २१४९) या लेखाशिर्षाखाली पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधी मधून (०.२५% प्रशासकीय खर्चासह) एकूण रुपये १७,७४,६४,०७८/- (अक्षरी रुपये सतरा कोटी चौऱ्याहत्तर लक्ष चौसष्ट हजार अठ्यात्तर फक्त) इतका निधी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात येत आहे. सदर निधी त्यांनी तात्काळ जिल्हाधिकारी, औरंगाबाद व बीड यांना वितरीत करावा.

३. सदर निधी मिळाल्यापासून चारा छावणी देयकाच्या अदायगीचे काम त्वरीत पूर्ण करावे, चारा छावणीबाबत उपरोक्त संदर्भीय शासन निर्णय दिनांक २५/०१/२०१९, दिनांक १३/०२/२०१६, शासन पत्र क्रमांक दिनांक ०८/०३/२०१९, शासन परिपत्रक दिनांक २२/०३/२०१९, तसेच शासन निर्णय

दिनांक ०४/०५/२०१९ व दिनांक १६/०५/२०१९ मध्ये नमूद निकष, विहित अटी व शर्ती व त्यामधील सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

४. वितरीत निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) अथवा बँक खात्यात न ठेवता तो छावणी चालकांना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरीत केला जाईल, या अटींच्या अधिन निधी वितरीत करण्यात येत आहे. तरी त्यानुसार संबंधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

५. सदर निधीचे वाटप अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना करण्यात येत आहे. निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी खातरजमा करावी. तसेच निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे / नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात याव्यात. तसेच झालेल्या खर्चाचा कोषागार कार्यालय व महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी ताळमेळ घेऊन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करावी.

६. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत मा.प्रधान सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण/उपशिर्षाच्या संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत.तसेच कोषागारातून/ उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

७. या शासन शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आलेल्या निधीतून दरमहा करण्यात आलेल्या खर्चाचा तपशील केंद्र शासनाने तयार केलेल्या www.ndmis.mha.gov.in या प्रणालीमध्ये संबंधित जिल्हयांनी भरावा. सदर माहिती या प्रणालीमध्ये न भरल्यास पुढील निधी वितरीत केला जाणार नाही.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९१/२०२१/व्यय-९,दिनांक २८/०५/२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०३३११२२३३४८८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2022.03.31 12:26:10 +05'30'

**( संजय औ.धारूरकर )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई

२) मा. प्रधान सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), यांचे स्विय सहायक,मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त,औरंगाबाद
४) महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण),महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर ( ३ प्रती)
५) जिल्हाधिकारी,औरंगाबाद व बीड
६) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य
७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
८) वित्त विभाग (अर्थसंकल्प-६/व्यय-९), मंत्रालय, मुंबई
९) कार्यासन अधिकारी (म-७), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती,(कार्यासन म-११)